

नागाचे पिल्लू अंड्यातून बाहेर येत आहे

ISBN 978-81-237-2194-1
प्रथम प्रकाशन : 1990 *(शके 1911)*
आठवी आवृत्ती : 2011 *(शके 1933)*
नववी आवृत्ती : 2013 *(शके 1934)*

The Snakes Around Us *(Marathi)*

**₹ 25.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नेहरू भवन, 5 इन्स्टिट्युशनल एरिया
वसंत कुंज, फेज-II, नवी दिल्ली-110 070 यांनी प्रकाशित केले.

नेहरू बाल पुस्तकालय

# सापांविषयी

झाई आणि रॉम व्हिटेकर



उडता साप

अनुवाद
वसंत शिरवाडकर

चित्रे आणि मांडणी
शेखर दत्तात्रय

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया



# सापांची ओळख

निसर्गात चित्तवेधक सुंदर असे जे काही सारे आहे त्यांत साप हे एक आहेत. सापांचा रंग, त्यांच्या हालचाली व कांही विचित्र स्वरूपाच्या सवयी यांमुळे साप आपल्याला अधिकच गूढ वाटतात. वन्य प्राणीजीवनात ज्यांना विशेष रस आहे, अशा लोकांना या जीवनाची ओळख करून घ्यायची तर त्यासाठी सापासारखे नवलाईपूर्ण दुसरे माध्यम नाही. कारण एक तर साप सर्व ठिकाणी असतात, त्याकरिता तुम्हाला खास अशा एखाद्या उद्यानात किंवा अभयारण्यात जायला नको.

शिवाय 'ट्रिंकेट' आणि डुरक्या घोणस ही एक अजगराची जात आहे यांसारखे साप पाळायला अगदी सोपे असतात. जगातले कित्येक थोर निसर्गशास्त्रज्ञ वन्य जीवनाकडे आकृष्ट झाले ते पाळीव प्राण्यांच्या प्रेमातून! आपल्या बिछान्याखाली अजगर अथवा पायतणाच्या पेटीत सरडा पाळणाऱ्या 'हौशी' व्यक्तींनी शास्त्रीय दृष्ट्या अत्यंत महत्वाची निरीक्षणे केली आहेत.

अनेक लोक मुलांना सापाला स्पर्श करू देत नाहीत, एवढेच नव्हे तर सापाच्या जवळ सुद्धा जाऊ देत नाहीत. विषारी साप हाताळू नये हे तर खरेच. पण निरूपद्रवी साप हातात

एका लहान मुलीने साप हातात धरला आहे.



सुंदर निरूपद्रवी 'आयडल' साप (या दाक्षिणात्य सापाला मराठी नाव नाही.

घेतल्यास एकूण सापांसंबंधीची भीती त्वरीत नाहीशी होते. साप हातात घेतल्यास तो गुळगुळीत, चिकट नाही आणि तो तुम्हाला इजा करायला टपलेला नाही, हा अनुभव तुम्ही शिकता. पण सुरुवात करणाऱ्यांनी प्रथम कोणता साप कोणत्या प्रकारचा आहे हे ओळखण्यास चांगले शिकून घेतले पाहिजे. तसेच कोणते साप टाळावेत हेही त्यांनी समजून घेतले पाहिजे.

# सापांचा नैसर्गिक इतिहास

काही वर्षांपूर्वी कर्नाटकातील अती पावसाच्या जंगलात साप पकडण्यासाठी रॉम फिरत होता. मद्रास येथील आपल्या सर्प उद्यानासाठी तो हे साप गोळा करीत होता. एके दिवशी सूर्यास्ताच्या सुमारास त्याने जमिनीवर साचलेल्या पाचोळ्यात खसफस झालेली ऐकली. तो खाली पाहातो तो एक शेपटी बाजूच्या झुडपात सर्ऽदिशी शिरून नाहीशी झाली. मनाची थोडीसुध्दा चलबिचल होऊ न देता रॉमने त्या शेपटीच्या मागे सूर मारला, आणि काय आश्चर्य! तो एक साडेतीन मीटर लांबीचा राजनाग होता! तो झटकन मागे वळला आणि आपल्या तोंडाचा आ वासून लढाईच्या पवित्र्यात उभा ठाकला. रॉमचे हे साहस यशस्वी झाले आणि मद्रासच्या त्याच्या उद्यानात हा राजनाग हे एक मोठे आकर्षण ठरले.

राजनाग हा जगातील सर्वात मोठा विषारी साप असल्याने, भारतीय सापांवरच्या पुस्तकात राजनागाचा निर्देश सर्वप्रथम करायला हवा. राजनाग पाच मीटरपर्यंत लांब वाढतो आणि साधारणपणे लठ्ठ्‌ माणसाच्या दंडाइतका तो जाड असतो.

राजनाग हा सर्वात मोठा विषारी साप आहे.



तथापि दक्षिण अमेरिकेतील अनाकोंडा हा बिनविषारी साप याहूनही लांब वाढतो. अनाकोंडा कधीकधी नऊ मीटर पर्यंत लांब असतो आणि एक अख्खे हरीण सहजपणे गिळतो. भारतातले जाळीदार त्वचा असलेले अजगर बहुधा ७ ते ८ मीटरपर्यंत वाढतात. त्यांचा जवळचा भाऊबंद खडक अजगर हा त्यांच्यापेक्षा अधिक आडदांड असतो, पण तो ६ मीटरपर्यंतच वाढतो. दुसऱ्या टोकाला आहे चिमुकला जिवाणू साप. तो साप आहे यावर विश्वास बसणे खरोखरच कठीण आहे. पुष्कळ वेळा लोक चुकीने त्याला गांढूळ समजतात. साप हिरवा गार व लांब असेल, अथवा मळकट तपकिरी व आखूड असेल. तो उंदीर खाईल किंवा पाखरे, मासे, फार काय दुसरे सापही खाईल. तेव्हा तुम्ही सापांच्या जीवनाचा अभ्यास करीत असताना सर्व साप सारखे आहेत किंवा सारखेच वागतात, असा समज करून घेऊ नका.



अजगर आणि गांढूळ साप

सापांचे वाढणे कधीच थांबत नाही. पण त्यांच्या आयुष्याच्या पहिल्या दोन वर्षांत त्यांची वाढ फार झपाट्याने होते. मुले वाढतात तसे त्यांचे कपडे व पायतणे त्यांना घट्ट होतात, त्यामुळे त्यांना वरचेवर नवे कपडे व नवी पायतणे घ्यावी लागतात. त्याचप्रमाणे सापांना ठराविक मुदतीने नवी त्वचा ल्यावी लागते. त्यांच्या त्वचेचा वरचा थर इतका घट्ट्‌ होतो की ते त्याखाली नवी त्वचा वाढवतात आणि जुन्यातून बाहेर येतात. याला कात टाकणे असे म्हणतात. कात टाकण्यापूर्वी साप मरगळतो आणि आळशी बनतो. कात टाकल्यावर साप तेजस्वी व तरतरीत दिसतो. साप हे जे नवे रूप धारण करतो ते पाहून साप अमर आहेत असा प्राचीन ग्रीकांमध्ये एक समज होता.



धामण कात टाकत आहे.

आपल्याप्रमाणेच साप विविध प्रकारचे अन्न खातात. सांप काय खातात हे ते कोठे राहातात व ते किती मोठे आहेत यांवर अवलंबून असते. उदाहरणार्थ, पाणसाप बेडूक व मासे सहजरीत्या पकडतात आणि गिळतात. झाडावरचे साप बहुधा झाडावरील पक्ष्यांच्या घरट्यांतील पिल्ले निर्दयपणे पकडतात आणि खातात. जमिनीवर राहाणारे बहुतेक मोठे साप उंदरांचे भक्षण करतात. यामुळे हे साप माणसाला उपकारक असतात.

पण खरे तर साप अल्पसंतुष्टच असतात. त्यांना नेमके जे हवे आहे ते जोपर्यंत मिळत नाही तोपर्यंत त्यांना भूक लागत नाही. एका नागाने मीटरभर लांबीची घोरपड गिळल्याचे आम्ही पाहिले आहे. दुसऱ्या एका नागाने खुळेपणाने एक खंड्या पक्षी गिळला. पण खंड्याची चोच नागाच्या घशात आडवी अडकून बसली. ती मग मोठ्या मुश्किलीने सरळ करून नागाची त्या प्रणसंकटातून सुटका करावी लागली.



बळकट व पिळदार स्नायू आणि मोठे व दणगट शरीर याच्या योगे अजगर अनेक प्राण्यांचे भक्षण करू शकतो. सर्प उद्यानात अजगरांना कोंबड्या व घुशी खायला देण्यात येत. रानातील अजगरांचा आहार मोठा मजेशीर आहे. मोठे अजगर बिबळे वाघ व सांबर यांसारख्या प्राण्यांना लोळवतात. शरीरात चरबी साठवण्याची व्यवस्था असल्याने सापांना रोज अन्न खाण्याची गरज वाटत नाही. छोटे साप काही थोड्या दिवसांच्या अंतराने एकदा याप्रमाणे अन्न खातात. पण मोठे साप कित्येक आठवडे नव्हे तर काही महिने अन्नाशिवाय राहू शकतात.

साप आपले अन्न चावून चघळून खात नाहीत. खरे तर सापांच्या भोजनपध्दतीत नाजूकपणा कसा तो मुळीच नसतो. ते अधाशासारखे आपले अन्न सर्वच्या सर्व गिळतात. आपण पुष्कळ वेळा साप बेडूक किंवा उंदीर गिळताना पाहातो. इतका मोठा बेडूक वा उंदीर साप कसा गिळू शकेल अशी आपल्याला शंका वाटते. पण आपल्याला कल्पनाही नसते एवढ्या प्रमाणात साप तोंडाचा आ वासतो. एखादा घट्ट मोजा ताणावा तशी साप आपली मान ताणतो, आणि ते भक्ष्य हळूहळू पण निश्चितपणे त्याच्या घशाखाली उतरते. टोक

सामान्य डुरक्या घोणस सातभाई पक्ष्याला खात आहे





सापाने आपल्या तोंडाचा पूर्ण आ वासला आहे.

आतल्या बाजूकडे असलेले दात भक्ष्य खाली लोटण्यास सापाला मदत करतात.

साप फक्त आपल्या जातीच्याच सर्पिणीशी संयोग करतात. सापाची मादी सरपटताना तिच्या बेंबीच्या ग्रंथीतून स्त्रवणाऱ्या वासाचा माग जमिनीवर टाकत पुढे जाते. या वासाचा नरांना माद्यांचा सुगावा लागण्यास मदत होते. कधी कधी अनेक नर एकाच सुंदरीचा पाठलाग करीत असल्याचे दिसत! सापाच्या काही जाती अंडी घालणाऱ्या असतात. अंडी पांढऱ्या रंगाची असतात आणि त्यांचे कवच कातड्यासारखे लवचिक असते. अशा कवचामुळे अंडे उबते तेव्हा आतील पिल्लांना ते फोडून बाहेर येणे सोपे जाते. मादी अंडी घालण्यासाठी सुरक्षित, निवाऱ्याची जागा शोधून काढते. काही काही जातींच्या सापांच्या माद्या अंडी उबेपर्यंत त्यांच्याजवळ राहातात, इतर जाती इतक्या एकनिष्ठ नसतात.

त्या अंड्यांना दैवाच्या हवाली करून तेथून निघून जातात. घोरपडी, मुंगुसे व इतर प्राण्यांना त्या अंड्यावर ताव मारण्यास हे आयतेच आमंत्रण ठरते!

पण सगळेच साप अंडी घालणारे नसतात. काही जाती पिल्लांना जन्म देणाऱ्या असतात, म्हणजे अंडी मादीच्या शरीरातच उबवली जातात. वेल साप, घोणस,समुद्रसर्प आणि डुरक्या घोणस हे साप या मार्गाने जन्मास येतात. सापाची जात जशी असेल त्याप्रमाणे अंडी उबून जन्मलेली पिल्ले गांडुळाइतकी छोटी असतील किंवा फूटभर लांब असतील.

सापांचे सुरुवातीचे आयुष्य सोपे नसते. अनेक शत्रूंपासून त्यांना आपले संरक्षण करावे लागते. पक्षी, कासव, मुंगुसे, फार काय बैल - बेडूक सुद्धा-यांच्यापासून सापांना या काळात धोका असतो. सापांचे बच्चे हे छोटे बेडूक, छोटे उंदीर व किडे खातात. निसर्गाचे वेळापत्रक खरोखर आदर्श म्हणावे असे असते. हेच पाहा, पावसाळ्याच्या सुरुवातीला बहुधा सापांची अंडी उबून पिल्ले बाहेर येतात. या वेळी मासे, बेडकांची पिल्ले व किडे भरपूर उपलब्ध

उडत्या सापाचा बच्चा



असतात. म्हणजे नव्याने जन्मास आलेल्या सापांना अन्नाची ददात पडत नाही.

सापांचा सर्वात घातकी शत्रू म्हणजे माणूस! माणूस सापांना काही गरज नसताना मारतो, त्यांच्या राहाण्याच्या जागेभोवती प्राणनाशक विषारी द्रव्ये फवारतो आणि सापांची वस्ती असलेली जंगले तोडून साफ करतो. सापांना इतरही अनेक नैसर्गिक शत्रू आहेत. सापाचा सर्वांना ठाऊक असलेला कट्टर शत्रू मुंगूस. हा छोटा युक्तिबाज कसरतपटू, प्रत्येक वेळी सापावर मात करतो असे दिसते. एका मगरीने धामण पकडली आणि स्वाहा केली हे दृश्य आम्ही पाहिले आहे. तसेच घोरपडी मेलेले साप खात असल्याचे आम्ही पाहिले आहे. भक्षक पक्षी (गरुड, घारी) आणि पाणपक्षी (बगळे, करकोचे) सापांना मारून खातात. कधी कधी हे पक्षी ज्यांत अंडी वा पिल्ले आहेत अशा जवळपासच्या घरट्याचा बचाव करण्याकरिताही सापांवर हल्ले करतात.अलिकडेच आमचा एक मित्र फणा काढून बसलेल्या एका नागाचे छायाचित्र टिपत होता, एवढ्यात आभाळातून अकस्मात एक ठिपकेधारी घुबड तीरासारखी झेप घेऊन खाली उतरले आणि त्याने आपल्या जबरदस्त नखांनी नागाच्या डोक्यावर तडाखा हाणला. नाग त्या तडाख्याने लवकरच मेला. निसर्गाचे डाव कधी कधी क्रूरही असतात!



बगळा साप खात आहे.

सापांची नजर बेरकी नसते आणि सहसा त्यांना अगदी जवळची वस्तू पण दिसत नाही. कित्येक वेळा असे घडले की आम्ही झाडझुडपातला साप जवळून निरखून पाहात असता तो साप शांतपणे आमच्या अंगावर चढला. एकदा एका नागाने एका झाडावरुन दुसऱ्या झाडावर जाण्यासाठी फांदी म्हणून चक्क रॉमचा उपयोग केला. सापांचे घ्राणेंद्रिय तीक्ष्ण असते आणि भक्ष्याची शिकार करतांना ते घ्राणेंद्रियाचाच उपयोग करतात.

मजा अशी की सापांचे मुख्य घाणेंद्रिय नाक नव्हे, तर जीभ हे आहे. साप जेव्हा शिकार करतो तेव्हा सारखी आतबाहेर होत असलेली जीभ वासाचे कण पकडत असते. साप संगीत ऐकतात, एवढेच नव्हे तर त्याला प्रतिसाद देतात, असा एक समज लोकांमध्ये आढळून येतो. सर्प-मांत्रिकाच्या पुंगीला नाग माना डोलावत असल्याचे पाहून नाग संगीताच्या तालावर नाचतो आहे, असे लोकांना वाटते. पण हे नक्कीच खरे नाही. प्रत्यक्षात तो नाग राक्षसासमान माणसाला आणि त्याच्या हातातल्या त्या वाद्याला भेदरलेला असतो, आणि अशा अवस्थेत तो माणसाच्या हालचालींवर नजर ठेवतो. साप हवेवरून आलेले काही आवाज त्यांच्या फुप्पुसांतून ऐकतात असे आढळून आले आहे. पण साप प्रतिसाद देतात ते बव्हंशी कंपनाला. ते त्यांच्या क्षीण श्रवणेंद्रियांवर फारच थोडे विसंबून राहातात.

## सापांचे संरक्षण का करावे?

एकदा आम्ही मद्रासच्या बाहेर माळरानात फिरत असता एक गुराख्याचे पोर एका सापाला चेचून मारीत असल्याचे पाहिले. "त्याला तू का मारतोस?" असे आम्ही त्या पोराला विचारले. "कारण तो इथं सापडला म्हणून", त्या पोराने ताल्काळ उत्तर दिले, आणि साप मारले जातात ते बहुधा याच कारणासाठी - ते आसपास असतात म्हणून. अनेक लोकांना सापांची भयंकर भीती वाटते आणि सापांविषयीच्या सर्व प्रकारच्या अद्‌भूत गोष्टींवर ते विश्वास ठेवतात. साप दिसला रे दिसला की त्याला मारले पाहिजे असे त्यांना वाटते. कोणी तरी साप मारल्याच्या हकिकती वरचेवर तुमच्या कानावर येतात - साप मारणारा पोस्टमन असतो, माळी असतो, शेतावर राहाणारा तुमचा मामा असतो, सहलीला गेलेला तुमचा चुलत भाऊ किंवा असाच आणखी कोणी असतो - आणि साप मारण्याचे कृत्य हा एक पराक्रम मानला जातो. सापांना आपण मुक्तपणे का जगू देत नाही?

सापांवर हल्ले करू नका.



पण सापांना मारतात त्याला दुसरे एक कारण आहे-त्यांचे कातडे. सापांचे कातडे 'कमावतात' किंवा त्यावर काही प्रक्रिया करतात आणि मग त्यापासून ऑफिस बॅगा, हँडबॅगा, कमरेचे पट्टे व बूट बनवतात. सापाच्या कातड्यांच्या निर्यातीस आता परवानगी नाही. पण बेकायदेशीर रीत्या हा व्यापार चालूच आहे. तुमच्या ओळखीचा कोणी माणूस सापाच्या कातड्यापासून बनवलेली वस्तू खरेदी करताना तुम्ही पाहिलेत तर त्याला तसे करू नकोस म्हणून सांगण्यास चुकू नका. अशा रीतीने तुम्ही एखाद्या नागाचे अथवा धामणीचे, डुरक्या घोणसचे अथवा पाणसापाचे जीव वाचवाल आणि एक अल्पशी पण देशाच्या दृष्टीने महत्वाची सेवा बजावाल. सापांचा त्यांच्या कातड्यासाठी उपयोग करायचा तर त्यांच्या संख्येचा योग्य तो अभ्यास करून ते काम शास्त्रशुध्द रीतीने झाले पाहिजे. 'वन्य जीवनाच्या साधनसामुग्रीचे व्यवस्थापन', असे याला म्हणतात. शेतकरी जशी पिकाच्या कामांची क्रमवार व्यवस्था लावतो त्याप्रमाणे बंदिस्तीतील जनावरांनाही पध्दतशीरपणे वाढवतात. जरूर तर कुंपण घातलेल्या जागेत

सापांच्या कातड्याची बाजारपेठ - सापांना त्यांच्या कातड्यासाठी मारणे आता बेकायदा आहे.



त्यांना ठेवतात, आणि अमुक एक संख्या ठरवून तेवढीच फक्त कातडे, मांस वा इतर उत्पादनांसाठी मारतात. या प्रकारे जनावरे मारणे हे वाटेल तशी जनावरे मारण्यापेक्षा नक्कीच वेगळे आहे.

साप आपले काय भले करतो? खरे तर साप हे अतिशय मूल्यवान प्राणी आहेत. कारण ते उंदीर खातात. उंदीर दरसाल आपल्या देशाची अर्धी अधिक धान्यपिके नष्ट करतात. तुम्ही सुगीच्या हंगामात शेतावर गेलात आणि तिथे उंदरांची बिळे आणि जमिनीखालच्े त्यांचे बोगदे धान्यांनी काठोकाठ भरलेले पाहिलेत तर उंदीर आपले केवढे प्रचंड नुकसान करतात याची तुम्हाला कल्पना येईल. इरुला आदिवासी लोक उंदीर खातात; त्यांना कित्येक वेळा एका बिळात १० कि. ग्रॅ. तांदूळ किंवा वाटाणे सापडतात. उंदीर तसा फार कष्टाळू प्राणी आहे. उंदीर खळ्यावरून तोंडभर दाणे घेऊन बिळाकडे पळतात; खळे ते बीळ आणि बीळ ते खळे अशा दिवसभर त्याच्या येरझारा चालू असतात. गरमीच्या हंगामासाठी ते अन्नाची बेगमी करून ठेवतात.

इरुलू एका उंदराच्या बिळातून धान्य गोळा करीत आहेत.





नाग उंदीर खात आहे.

उंदरांना खाणारे अर्थातच इतर प्राणी आहेत. पक्षी, सरडे, कोल्हे, मगरी असे इतर अनेक. पण साप हा एकच प्राणी आहे की जो थेट उंदरांच्या बिळापर्यंत त्यांचा पाठलाग करतो. साप उंदराला त्याच्या बिळात मारील आणि त्या बिळाचा आपल्या उपयोगासाठी ताबा घेईल असेही अनेकवेळा घडते. साप ज्या विलक्षण सफाईने उंदीर पकडतात व मारतात ते आम्ही अनेक वर्षे पाहतो आहोत. पण अगदी आजही आम्हाला त्याचे कौतुक वाटते. अजगर घुशींना विद्युत वेगाने पकडून आपल्या बळकट स्नायूंच्या विळख्यात चिरडून टाकतात हे आम्ही पाहिले आहे; बारके झाडसाप छोटे उंदीर आणि मोठ्या उंदरांची पिल्ले व्यवस्थित हाताळतात, हेही आम्ही पाहिले आहे; आणि डुरक्या अजगर जमिनीखाली भुयार खोदून त्या भुयारातून उंदरांनी मोठ्या अक्कलहुशारीने केलेल्या बिळांत जाऊन पोहोचतात हे सुध्दा आम्ही पाहिले आहे. माणसाने तंत्रशास्त्राच्या बाबतीत एवढी प्रगती केली असली तरी उंदरांची संख्या घटवण्याचे निसर्गाचे मार्ग माणसाच्या मार्गापेक्षा अधिक परिणामकारक आहेत. उंदरांचा नायनाट करण्याकरिता माणूस जमिनीत ज्वलज्जहाल कीटकनाशके पेरून ठेवतो. पण उंदीर लवकरच ती अंगवळणी पाडून घेतात आणि त्यांचा त्यांच्यावर काहीही परिणाम होत नाही. तसेच पिंजऱ्यात कसे अडकू नये हे उंदीर लवकर शिकतात. आमचे घर उघडे असल्यामुळे शेजारचे सर्व उंदीर आमच्या घराकडे आकृष्ट होतात. त्यांना पिंजऱ्यात पकडण्यासाठी आम्हाला कोण खटपट करावी लागते! पिंजऱ्यात ठेवलेल्या चीझचा अथवा पावाचा तुकडा पिंजऱ्यात न अडकता कसा पळवावा हे उंदीर थोड्याच दिवसांत शिकतात. तेव्हा, यातून आम्ही

मार्ग काढला तो असा की घराच्या छपराकडे आम्ही अनेक मोठे उंदीरखाऊ साप सोडले आणि त्यांचा परिणाम झाला. सापाला त्याचे श्रेय आपण द्यायला हवे. आजपावेतो घडवलेल्या उंदरांच्या सापळ्यांमध्ये सापाइतका परिणामकारक कोणताही सापळा नाही!

सापासारखा हल्लेखोर भक्षक हा प्राणी आणि वनस्पती यांना बांधणारी जीवनाची जी साखळी आहे त्या साखळीतील एक फार महत्वाचा दुवा आहे. या साखळीतील एक दुवा जरी गमावला तरी पृथ्वीवरच्या संबंध प्राणीसृष्टीला ते अत्यंत हानिकारक ठरेल.

सापांचा अधिक प्रत्यक्ष असा आणखी एक उपयोग आहे. त्यांचे विष हा एक अतिशय उपयुक्त रासायनिक पदार्थ असल्याचे आढळून आले आहे. अनेक औषधे बनवण्यासाठी त्याचा उपयोग करतात. नागाच्या विषापासून 'कोब्राक्सिन' हे औषध बनवतात; अत्यंत तीव्र स्वरूपाच्या वेदनांवर ते हमखास गुणकारी आहे.

सापांच्या विषात अनेक प्रकारचे टॉक्सिन प्रोटिन व एन्झाइम असतात. सापाच्या 'गालात' असलेल्या लाळेच्या दोन मोठ्या ग्रंथी विष तयार




नागाचे डोके – त्यात नागाच्या विषग्रंथी (VG) आणि विषाचे दात दाखवले आहेत.

करतात. साप चावतो तेव्हा हे विष त्याच्या तोंडातील दोन पोकळ दातांत सरꣳकन उतरते. या विषाने भक्ष्य ताबडतोब मरते. प्रतिकार करण्यास अथवा दूर पळून जाण्यास संधी मिळण्यापूर्वी त्याने जीव गमावलेला असतो. ही गोष्ट महत्त्वाची आहे. कारण वेळ येते तेव्हा उंदीर सुध्दा जबरदस्त शत्रू होऊ शकतो. साप उंदीर खातात तेव्हा कधी कधी ते सापांना चांगलीच इजा होईल इतके कडकडून चावतात.

सापांच्या विषापासून विषप्रतिबंधक लस बनवतात, हा त्यांचा आणखी एक महत्वाचा उपयोग. सर्पदंशावर या लसीचा इलाज होतो.



## सापांसंबंधीच्या दंतकथा

आपले नातेवाईक व मित्रपरिवारात सापांसंबंधी अद्‌भूत कथा सांगणारे पुष्कळजण असतात. "अमुक साप त्याच्या शेपटीने डंख मारतो" अथवा "तमुक साप माणसाच्या डोळ्यांवर आघात करून ते बाहेर काढतो." तुम्हाला एखाद्या विषयाची चांगली माहिती नसेल तर इतर कुणी अशा अजब कथा सांगितल्यास त्यावर तुमचा सहज विश्वास बसतो. पण सापांचा नैसर्गिक इतिहास तुम्ही अभ्यासलात तर या कथा किती हास्यास्पद आहेत हे तुम्हाला कळून चुकेल.

उदाहरणार्थ, साप दूध पितात असा पुष्कळ लोकांचा समज असतो. मद्रासच्या सर्प उद्यानात लोक सापांसाठी चरव्या भरभरून दूध घेऊन येतात. हे दूध उद्यानाच्या कर्मचाऱ्यांच्या कॉफीत जाते हे मला कबूल केले पाहिजे. सापाला फार तहान लागली तर तो दुधाचा एखादा घोट घेईलही. पण दूध हे काही सापांचे नैसर्गिक अन्न नाही. रानात सापाला दूध कढून मिळणार? साप दूध पितात असे म्हणणे म्हणजे वाघ संत्र्यांचा रस पितात असे म्हणण्यासारखेच आहे. साप गायी व शेळ्यांच्या सडांना लागून त्यांचे दूध शोषून घेतात, असा मुद्दा लोक यावर पुढे करतील. पण सापांचे दात इतके धारदार असतात की कोणतीही गाय ते क्षणभरही सहन करू शकणार नाही, ही साधी गोष्ट लोक विसरतात. लोकांमध्ये आढळून येणारा दुसरा एक समज – अर्थात गैरसमजच तो – असा की नाग धामणीबरोबर समागम करतात साप फक्त त्यांच्या जातीच्या सर्पिणीबरोबरच समागम करतात. पाळलेल्या सापांमध्ये दोन जातींचा संकर करण्याचा प्रयोग करत असतीलही. पण ती काही नैसर्गिक रीत नव्हे.

या दंतकथांमुळे सापांची अतोनात हानी होते. वेल साप हा वस्तुतः दिसायला गरीब व सहज माणसाळणारा साप आहे. पण लोकांनी त्याची कोण दहशत घेतली आहे! कारण काय तर म्हणे हा साप टोचे मारून माणसाचे डोळे बाहेर काढतो! तामिळमध्ये त्याला **कण्ण कुठी पंबु** – म्हणजे डोळे काढणारा साप असे नाव आहे. एकदा हा साप हातात धरून तो कसा निरुपद्रवी आहे हे भोवती जमलेल्या मुलांना रॉम समजावून सांगत होता. एवढ्यात त्या सापाने गिरकी मारली आणि तो रॉमच्या नाकाला चावला. त्यासरशी मुले आनंदाने ओरडले, "हा साप डोळ्यांना नव्हे तर नाकाला डसणारा आहे." काशाच्या रंगाची पाठ' असलेला झाडसाप क्वचित कुणाला चावतो, आणि तो अर्थात बिनविषारी आहे. पण त्याच्याविषयी असाच पोरकट लोकप्रवाद आहे. तो म्हणे माणसाला



वेल सापाचे मागच्या बाजूस रूंद व पुढे निमुळते डोके.

चावल्यावर जवळपासच्या एखाद्या उंच झाडावर चढून बसतो आणि त्याचा बळी झालेल्या माणसाची अंतयात्रा येण्याची वाट पाहात तिथे बसतो. अशा कथा पुनः पुन्हा सांगितल्या जातात आणि पुष्कळ वेळा सांगणारी माणसे सुशिक्षित असतात. अन्न खाणे, विश्रांती घेणे आणि शत्रूंना टाळणे याच्या पलीकडे सापाचा मेंदू विचार करू शकत नाही. आणि हे सर्व तो सहजप्रवृत्तीने करतो. माणसासारख्या वरच्या श्रेणीतील प्राण्यांप्रमाणे त्याला पुढचा विचार करता येत नाही, अगर योजना आखता येत नाही. तेव्हा सूड किंवा असूया यांसारख्या जटिल भावना सापांना असतात असे म्हणणे सपशेल चुकीचे आहे. सापाचा मेंदू छोटा व साधा असतो. उंदरांचा पाठलाग कुठे करावा, पाणी कुठे मिळेल – अशा साध्या गोष्टी त्याचा मेंदू त्याला सांगू शकतो, याहून अधिक गुंतागुंतीचे नाही.

सापांसंबंधीच्या दंतकथा सर्व देशांत अस्तित्वात आहेत. अमेरिकन लोक 'हूप' सापासंबंधी सांगतात की हा साप शेपटी तोंडात घालून अंगाला चाकोरी किंवा चाकाचा आकार देतो आणि टेकड्यांवरुन खाली गरगरत येत माणसांचा पाठलाग करतो. सर्व साप विषारी असतात यावर भारतीयांप्रमाणे अनेक अमेरिकन विश्वास ठेवतात.



सापांसंबंधीच्या दंतकथांचे मूळ कशात आहे हे समजणे तसे काही अवघड नाही. कदाचित केव्हा तरी एखाद्या फार डिवचल्या गेलेल्या वेल सापाने कुणा तरी माणसाच्या डोळ्याला डंख मारला असेल. हा साप डोळे फोडतो अशी आवई उठवण्यास ही गोष्ट पुरेशी ठरली. एखादा साप मारला तर त्याचा जोडीदार त्याचा सूड घेण्यासाठी त्या जागी येतो, असा एक समज लोकांमध्ये फार मोठ्या प्रमाणावर प्रचलित आहे. असा समज होण्यामागचे कारण असे असावे की प्रक्षुब्ध झाले असता सर्व साप त्यांच्या बेंबीमधून एक वास सोडतात. सापाला मारले किंवा जखमी केले तर अशा अवस्थेत तो हा वास सोडतो आणि जवळपास असलेला दुसरा एखादा साप त्या वासाचा माग काढीत काय प्रकार घडला ते अजमावण्यासाठी त्या ठिकाणी येतो, सापाला मारले त्या माणसावर हल्ला करण्यासाठी नक्कीच नव्हे.

साप माणसाला आजारी पाडतात, अशा प्रकारचेही अनेक लोकाप्रवाद आहेत. डुरक्या घोणस कुष्टरोग आणतो हा असाच एक बिनबुडाचा लोकाप्रवाद. सापांचा अभ्यास करायचा एकच मार्ग आहे, आणि तो असा की तुमची माहिती कितपत खरी आहे ते एखाद्या पुस्तकावरून अगर ज्याने सापांचा अभ्यास केला आहे अशा माणसाकडून तपासून घ्यावे.



## सापधरे लोक

साप दिसताक्षणी पळून जाणारे लोक अनेक असतात. पण साप शोधून काढून त्यांना पकडण्याचे काम जोमाने करणारेही आहेत. हेच पहा, भारतातून सापांची कोट्यावधी कातडी परदेशात पाठवली जात होती तेव्हा काही लोक धंदेवाईक सापधरे झाले होते. साप पकडून त्यांचे कातडे विकून त्यावर ते आपला उदरनिर्वाह करत. हे लोक बव्हंशी नाग, धामण, घोणस, अजगर, डुरक्या घोणस, यांसारखे जमिनीवर राहाणारे मोठे साप पकडत. दक्षिण भारतात तमिळनाडूतील इरुला आदिवासी सापांच्या कातड्यांच्या निर्यातीसाठी पुरवठा करीत असत. आम्ही त्यांच्याबरोबर सुमारे दहा वर्षे काम केले. साप शोधून काढण्याच्या त्यांच्या अलौकिक बुध्दीबद्दल आम्हाला त्यांचे फार कौतुक वाटते. चौकलिंगम, राजेंद्रन, रामन, वैल्लाई इत्यादी आमच्या अनेक इरुला मित्रांना सापांची जेवढी माहिती आहे तेवढी तुम्हा आम्हाला कधी सुध्दा मिळण्याची आशा नाही. इरुला माणूस रेतीत पुसरटशी वाट पाहतो, तो वाकून त्या वाटेचे निरीक्षण करतो – आणि येथून दहा मिनिटांपूर्वी एक छोटा नाग गेल्याचे सांगतो. मग ती वाट धरुन तो चालत जातो आणि सुमारे शंभर मीटर अंतरावर माळरानात एका उंदराच्या बिळाशी येतो. त्या जागी तो पहारीने खणत राहातो. आहे, बिळात साप आहे! बिळाकडे गेलेला एक मऊसूद, नुकताच खोदलेला भुयारी मार्ग दिसतो. हा वेडावाकडा मार्ग खोदल्यावर एक शेपटी दिसते. ती धरून खवळलेल्या नागाला बाहेर काढण्यात येते. दुपारच्या विश्रांतीत उद्धटपणे व्यत्यय आणल्याबद्दल नाग फुंपाट करत असतो.

सापांच्या कातड्यांच्या निर्यातीवर बंदी घालण्यात आली आहे आणि काही इरुला त्याऐवजी साप त्यांच्या विषासाठी पकडतात. हे विष पुणे येथील 'सिरम इन्स्टिट्यूट', मद्रास येथील 'किंग इन्स्टिट्यूट' आणि विषप्रतिबंधक लस तयार करणाऱ्या इतर प्रयोग शाळांना विकण्यात येते. इरुलांनी 'इरुला सापधऱ्यांची सहकारी संस्था' अशी एक संस्था स्थापन केली आहे. पकडून आणलेले साप या संस्थेमध्ये मातीच्या थंड मडक्यांमध्ये साठवतात. विष तीन वेळा काढण्यात येते. सापाची मान मागच्या बाजूने पकडून त्याला रबराच्या एका तक्त्यावर सरळ करण्यात येते. संतापलेला व त्याचबरोबर घाबरलेला तो साप आपला बचाव करण्याकरिता अधीर होतो आणि त्याभरात तो त्या रबरी तक्त्याला चावतो. आठवड्याच्या अंतराने एकदा याप्रमाणे तीन वेळा विष काढल्यावर सापाला पुन्हा रानात सोडून देण्यात येते आणि विष वाळवून त्याची भुकटी करण्यात येते व ती विकण्यात येते.

← इरुला एका सापासमवेत.



एका नागाचे विष काढण्यात येत आहे

भारतात साप पकडणाऱ्यांच्या अनेक जमाती आहेत. करवतीसारखे खवले असलेले छोटे फुरसे मुंबईच्या हाफकिन इन्स्टिट्यूटला महारलोक विकतात. विषप्रतिबंधक लस तयार करण्यात ही संस्था अग्रेसर आहे.

ओरिसात भुवनेश्वरच्या बाह्य परिसरात पाटिया नावाचे गारूडी लोकांचे एक छोटेसे खेडे आहे. या लोकांचे दास असे आडनाव असून ओरिसाच्या समुद्रकिनाऱ्यालगतच्या दलदलीत वाढणाऱ्या पळकाट्यांत राजनाग पकडण्यात त्यांचा हातखंडा आहे. ते या नागांचे विषाचे दात काढून टाकतात आणि देशातील मोठ्या शहरांत त्यांचे खेळ दाखवत फिरतात.

सापधऱ्यांचा आणखी एक प्रकार आहे आणि आपणा बहुतेकांना तो कधीना कधी तरी भेटतो. आमच्या मुंबईच्या एका शेजाऱ्याने एकदा एका ''सापधऱ्याला'' आपल्या घराच्या आवारात जे काय साप असतील ते सर्व काढून टाकायला सांगितले. हा सापधऱ्या हे काम कसे करतो ते आम्ही नजर देऊन पाहात होतो. प्रथम त्याने सर्वांना दूर मागे जाऊन उभे राहायला सांगितले, आणि तो पुंगी वाजवत आवारात सर्वत्र फिरत राहिला. मग अचानकपणे त्याने एका झुडपाच्या मागे उडी मारली आणि एका वळवळणाऱ्या नागाला शेपटीने धरून तो पुढे आला. आम्ही सर्वजण आवाक् होऊन पाहात राहिलो. त्या सापधऱ्याने मग आमच्या मित्राच्या छोट्याशा आवारातून असेच आणखी चार साप काढले. ते बहुतेक सर्व डुरक्या घोणस होते, पण ते घोणस आहेत अशी तो सापधऱ्या आमची खात्री पटवून देत होता. त्या नागाची आम्ही अधिक जवळून पाहाणी केली तेव्हा त्याचे विषाचे दात काढून टाकण्यात आले असल्याचे आम्हाला आढळून आले. त्या लबाड माणसाने आपले स्वतःचे साप बरोबर आणले होते!

तुम्ही रस्त्यावर पुंगी व सापाची टोपली घेऊन फिरणारा जो गारुडी पाहता तो मुळीच खरा साप पकडणारा नसतो. रानावनात जाऊन जे खरोखर साप पकडतात त्यांच्याकडून हा गारुडी साप विकत घेतो आणि सुरक्षिततेसाठी त्याचे विषाचे दात उपटून काढून टाकतो. कधी कधी निर्दयपणे सापाचे तोंड शिवून टाकण्यात येते. साहाजिकच या सर्व प्रकारांमुळे साप आजारी होतो. दातांखेरीज त्याला खाता येत नाही आणि एकदोन महिन्यांत तो मरतो. गारुड्याच्या पुंगीवर ''नाचणारा'' नाग प्रत्यक्षात फार आजारी असतो – भेदरलेला आणि जगण्याला कंटाळलेला जीव!



जगातील अनेक देशांत सापांची पूजा करतात. भारतात शिव व इतर काही देवांबरोबर बहुधा साप दाखवतात आणि विशेष हे की येथे सर्पदंशाची एक देवीही आहे. महाराष्ट्रात बत्तीस शिराळे या गावी नागपंचमीच्या सणाला पुरुष, बायका व मुले नवे नवे नाग पकडून त्यांना फुले, तूप व पैसे वाहून त्यांची पूजा करतात. अमेरिकेत जे ख्रिश्चन गट श्रध्दाबळावर विश्वास ठेवतात ते विषारी सापसुध्दा कुणाला इजा करणार नाहीत असे मानतात. जेथे धामणी व इतर असेच इतर विषारी साप पेट्यांमधून ठेवलेले असतात तेथे ही मंडळी सभा भरवतात. हे लोक पुढे येऊन पेट्यांमध्ये हात घालतात आणि आतील सापाला खेचून बाहेर काढतात. साप चावला तरी माणूस मरणार नाही यावर त्यांचा विश्वास असतो. पण याचे परिणाम पुष्कळ वेळा प्राणघातक ठरले आहेत.

ब्रह्मदेशातील शान लोकांचा एक विचित्र विधी आहे. कुणी एखादा तरबेज सापधऱ्या जंगलात जातो आणि एक प्रचंड भुजंग घेऊन येतो. मग एखाद्या मंगल दिवशी त्या भुजंगाला टोपलीत घालून मोकळ्या अशा शेतात नेण्यात येते. गावातले लोक त्याच्या भोवती घोळका करुन उभे राहतात. टोपली उघडण्यात येते. भुजंग जसा त्याच्या सबंध उंचीपर्यंत उभा राहतो तशी एक मुलगी सामोरी येते आणि पुढे वाकून त्या भुजंगाच्या मस्तकाचे चुंबन घेते.

नागपंचमीच्या सणाला सर्प-मांत्रिक नाग धरत आहेत.



काही लोक साप खातात. हाँगकाँग शहरात काही उपाहारगृहे अशी आहेत की जेथे पिंजऱ्यात ठेवलेल्या अनेक सापांमधून तुम्हाला हवा तो तुम्ही निवडू शकता. तो साप मग मारण्यात येतो आणि शिजवून तुमच्यापुढे ठेवण्यात येतो. इंडोनेशियाच्या इरियन जावा, या प्रांतात कोरोडेसीस लोकांनी एकदा रॉमला रौफाइर नदीवर ख्रिसमसच्या मेजवानीचे आमंत्रण दिले. मेजवानीतील प्रमुख खाद्यपदार्थ होता वाफाळलेला अजगर. (रॉम म्हणतो की त्याची चव बरीचशी कोंबडीच्या सागुतीसारखी छान लागली) खुद्द आपल्या देशात ईशान्य भागातील चकमा आणि नैऋत्य भागातील पोलियार या लोकांनी साप हा नित्याच्या आहारातील एक पदार्थ केला आहे. इतरांना सापाची चरबी व मास हे वैद्यकीय दृष्ट्या मोलाचे वाटतात.

सापांवरील संशोधनाच्या जगतात काही नावे लोकोत्तर ठरली आहेत. न्यू यॉर्क येथील ब्रॉंक्स प्राणीसंग्रहालयाचे सरसंचालक रेमॉंड डिटमार्स यांनी सापांना लोकप्रियता मिळवून देण्यात व तरूणांना सापांचा अभ्यास करण्यास प्रोत्साहन देण्याचे जेवढे कार्य केले तेवढे दुसऱ्या कुणाही व्यक्तीने केलेले नाही. त्यांचे 'स्नेक्स ऑफ दि वर्ल्ड' ('जगातले साप') हे पुस्तक अमेरिकेतील तरूण सर्प-रसिकांचे बायबल ठरले आहे. आफ्रिकेत स्थायिक झालेले एक इंग्लिश सेनाधिकारी पीजेपी आयोनिडेस हे एक शिकारी व साप पकडणारे होते. असामान्य धैर्याबद्दल त्यंची ख्याती होती. ते मंबा, बूमशांग, पफ ॲडर व इतर भयानक साप जगातील प्राणिसंग्रहालये आणि विषप्रतिबंधक लसी तयार करणाऱ्या केंद्रांसाठी पकडत असत.

पण फ्लोरिडातील (अमेरिका) मियामी येथे अगदी अलिकडेपर्यंत सर्प उद्यान चालवणारे बिल हास्ट हे आज अनेक वर्षांपासून सर्प-प्रेमींचे गुरु आहेत. ते जगाच्या सर्व भागांतील सापांचे विष काढतात. यांत भारत व पाकिस्तानातील नाग व मणियार, थायलंडमधील राजनाग, आफ्रिकेतील मंबा व पफ ॲडर, ऑस्ट्रेलियातील व्याघ्र-सर्प व तैपान अशा इतर शेकडो सापांचा समावेश होतो पण हास्टची विशेष ख्याती आहे ती ते ज्या रीतीने साडेचार मीटर लांबीचा राजनाग हाताळतात व त्याचे विष काढतात त्याबद्दल. ते राजनागाला त्याच्या पेटीमधून बाहेर काढतात आणि चिमटा, साप धरायचा गळ किंवा इतर कोणतेही हत्यार न वापरता आपले काम पार



पाडतात. जगातल्या महाभयंकर सापांना कुशलतेने व शांत चित्ताने हाताळून हास्टनी उद्यानाला भेट देणाऱ्या लोकांना अनेकदा थक्क केले आहे. राजनागाच्या दंशाने कुणीही वाचल्याचे नमूद नाही, याला अपवाद एकच आणि तो बिल हास्ट. हे कसं जमवतात? तरुण असतानाच त्याने काही विशिष्ट सापांच्या विषांचा आपल्यावर परिणाम होऊ द्यायचा नाही, असा निश्चय केला आणि आपण जशी कॉलरा किंवा टायफॉइड या रोगांचा प्रतिबंध करणाऱ्या लसी टोचून घेतो त्याप्रमाणे त्याने आपल्या शरीरात विष टोचून घेण्यास सुरुवात करून त्याचा शरीरावर काहीही परिणाम होणार नाही अशी स्थिती येईपर्यंत डोस वाढवत नेला. कुणी तरी विनोदाने म्हटले, ''त्यांच्या शरीरात इतकं विष आहे की ते तुम्हाला न चावतील तर बरं!'' राजनाग चावले असताही ते वाचले – एरवी ते जिवंत राहाणे शक्यच नव्हते. विषारी सापांनी त्यांना दंश केला असे किमान शंभर वेळा तरी घडले असेल.

← बिल हास्ट एका नागासमवेत.

## विषारी साप

### बडे चार

भारतात विषारी सापांच्या २३६ जाती असून आकार, रंग आणि सवयी या बाबतीत त्या खूप वेगळ्या असू शकतील. यापैकी ५० जाती विषारी असल्या तरी त्यांच्यातील बहुतेकांपासून माणसाला काहीही धोका नाही. बंगालचा घातक आगीमणियार क्वचितच चावतो. ज्यांच्यापासून पूर्ण सावधगिरी बाळगायची असे चार बडे विषारी साप आहेत, ते असेः नाग, मणियार, घोणस आणि फुरसे. बिनविषारी निरूपद्रवी सापांचा अभ्यास करताना या चार बड्यांपासून दूर राहाण्याची खबरदारी घेतली पाहिजे. त्यांच्या वाटेला जाऊ नका, ते तुमच्या वाटेला जाणार नाहीत. या महाभागांची आपण जरा जवळून ओळख करुन घेऊ या.

नाग आपणा सर्वांच्या परिचयाचा आहे. जगातल्या अतिशय प्रसिध्द सापांपैकी तो एक आहे. घाबरलेला असतो तेव्हा नाग स्वतःला वर उचलतो आणि आपल्या फासळ्यांची हाडे पसरवतो. नागाने फणा काढला असे आपण याला म्हणतो. नागाची कीर्ती दिगंत जर कशाबद्दल पसरली असेल तर ती फणा काढण्याबद्दल. खरे तर याला "बचावाचे प्रदर्शन" असे म्हणतात. उभे ताठ होऊन मोठे दिसण्याचा देखावा करुन आपण धोकादायक प्राणी आहोत असे नाग शत्रूला दाखवत असतो.

नाग हा सापांचा असा एक गट आहे की जो जगाच्या अनेक भागांत विखुरलेला आहे. भारतीय उपखंडात नागाच्या तीन जाती आहेत, त्या अशा : 'एक' आकडेवाला, 'दहा' आकडेवाला आणि काळा. राजनाग हा नागासारखा उभा होत असला व फणा काढत असला तरी तो काही खरा नाग नव्हे; तो नागाच्या नात्यातला साप आहे. आफ्रिका आणि आग्नेय आशियाच्या काही भागात आढळणारा 'चुळणी टाकणारा' नाग आपण पिचकारीमधून रंग वा पाणी उडवतो त्याप्रमाणे आपल्या विषाच्या दातांमधून विषाची चुळणी शत्रू आंधळा होईल अशा रीतीने त्याच्या डोळ्यांवर नेम धरून टाकतो आणि तेथून सटकतो.

भारतात नागाची कातड्यासाठी फार मोठ्या प्रमाणावर शिकार करतात. त्यामुळे ते बुजरे व भितरे झाले आहेत. सांजकाळी भाताच्या शेताच्या बांध्यावर छोटे मोठे उंदीर पकडण्यासाठी त्यांच्या जोरदार हालचाली चालतात. तुम्हाला वेळप्रसंगी जंगलात नाग दिसेलही. पण ते बहुधा पीकलागवडीच्या क्षेत्रातच राहातात. कारण उंदीर येथेच असतात.

नागाची मादी जून ते ऑगस्ट या काळात १० ते ३० अंडी घालते. नंतर दोन महिन्यांनी



एक सामान्य नाग

अंडी उबतात तोपर्यंत ती त्यांच्याजवळ राहाते. आम्हाला नागाची अंडी वाळव्यांची टेकाडासारखी वारुळे, उंदरांची बिळे, मातीचे भराव, झाडांच्या ढोल्या आणि अशाच इतर निवाऱ्याच्या जागी आढळली आहेत.

सामान्य मणियार ओळखायला सोपा असतो. त्याच्या निळसर काळ्या अंगावर पांढऱ्या रंगाची कडी असतात आणि त्याचे डोके आखूड व बोथट असते. मणियार दीड मीटर लांबीपर्यंत वाढतात आणि चार बड्यांमध्ये ते सर्वात अधिक धोकादायक असतात.

मणियारचे विष नागाच्या विषापेक्षा दसपट जहाल असते. आशियातील जमिनीवर राहाणाऱ्या सर्व सापांच्या विषापेक्षा मणियारचे विष अधिक टॉक्सिक असते.

मणियार निशाचर आहेत. ते रात्री आपले उद्योग करतात आणि दिवसा विश्रांती घेतात. भारतात ते सर्वत्र आढळतात आणि बहुदा रेताड जमिनीतील उंदरांच्या बिळात राहतात. चुनाविटांचा ड़बर ही त्यांची आवडती लपण्याची जागा. कारण अशा ड़बरामध्ये त्यांना निवाऱ्यासाठी सांदीकोपरे व फटी पुष्कळ



मणियार

घोणस



मिळतात. मणियार हे स्वजातभक्षक आहेत म्हणजे ते साप खातात. उंदीर, सरडे व पक्षी हेही त्यांचे भक्ष्य आहे. मादी १० ते १५ अंडी घालते आणि नागाच्या मादीप्रमाणे ती उबेपर्यंत त्यांच्यापाशी राहाते.

घोणस हा शरीराने लठ्ठ व बोजड साप आहे. पण संकटात असताना तो कमालीच्या वेगाने धावतो. त्याच्यावर हल्ला केला तर तो स्प्रिंगसारखा हवेत उडेल आणि आपल्या सर्व शक्तीनिशी आघात करील. त्याच्या अंगावरची साखळीसारखी चित्राकृती आणि त्याच्या आकाराचे चापट डोके याने तो सहज ओळखता येतो. त्याचे लांबट व बाकदार विषाचे दात उंदीर व इतर भक्ष्यांना मारण्यास फार सोयीचे आहेत.

इतर सर्व सापांप्रमाणे घोणशीला डिवचले तरच ती चावते. कधी कधी डिवचले तरीही ती चावत नाही. गेल्या वर्षी आम्ही एका घोणशीला जरा जादाच उपद्रव दिला, पण ती फारच सभ्य होती. एक दिवशी रात्री रॉमने आमची कुत्री जोरजोराने भुंकत असल्याचे ऐकले, आणि काय भानगड आहे हे पाहाण्यासाठी तो बाहेर आला. व्हरांड्यातून त्याने पाय खाली टाकला आणि

घोणशीचे विषाचे दात उठावदार आहेत



**बाप रे बाप!** पायाखाली त्याला काहीसे खरखरीत, घोणशीच्या अंगासारखे काही तरी लागले. रॉमने हवेत उंच उडी मारली. जमिनीवर तो आला ते एका मोठ्या मीटरभर लांब घोणशीपासून तीन हात अंतरावर. रॉमने त्या सापाच्या पाठीवर व्यवस्थित, जोराचा पाय दिला होता. इच्छाच असती तर झटकन् वळून रॉमला दंश करण्यास सापाला पुरेसा वेळ होता. या अनुभवाने रात्री आमच्या बरोबर नेहमी दिवा ठेवण्याचा धडा आम्ही शिकलो.

इरुलांबरोबर साप पकडण्याच्या मोहिमेवर असताना, घोणशींना उघडी माळराने फार आवडतात असे आम्हाला आढळून आले. शेतजमिनीच्या सरहद्दीवर असलेली कॅक्टसची कुंपणे हे साप खास करुन पसंत करतात. तेव्हा, बांध व काटेरी कुंपणाजवळून जाताना तुमचे पाऊल कुठे पडत आहे याची काळजी घ्या. घोणशी जास्त करून उंदीरच खातात. त्यांना एकावेळी २० ते ४० पिल्ले होतात. पिल्ले अतिशय सुंदर दिसतात, त्यांचा रंग तेजस्वी व तजेलदार असतो, आणि सर्व विषारी सापांप्रमाणे त्यांना विषाचे दात व विष जन्मापासूनच येते.

फुरसे हा चार बड्यांच्या गटाचा सर्वात छोटा सभासद. (दक्षिण भारतात तो फक्त ३० सें.मी. लांब असतो.) हा छोटा प्राणी अनेक सर्पदंशांचा धनी आहे, कारण हा एक सामान्य साप असून सर्वदूर विखुरलेला आहे. त्याच्या अंगावर नागमोडी चित्राकृती असते , आणि सर्व घोणशीप्रमाणे त्याचे डोके चापट असते. त्याच्या हालचाली अतिशय वेगवान असतात. हे साप सपाट, मोकळ्या प्रदेशाचे रहिवासी असून खडककपारी, मोठे धोंडे अथवा खुरटी झुडपी यांखाली लपून बसणे त्यांना आवडते. रामने महाराष्ट्रातील रत्नागिरी जिल्ह्यात स्थानिक महार सापधऱ्यांच्या मदतीने पावसाळ्यात धोंड्यांच्या खालून हजारो फुरशी शोधून काढली.

मणियाराप्रमाणे फुरशीसुध्दा निशाचर आहेत. पण कधी कधी रात्रभर पाऊस पडला असेल तर दिवसा ती मोठ्या संख्येने ऊन खात पडलेली दिसतात.

साप हे प्राणी थंड रक्ताचे असल्याने, उब हवी असेल तर ते ऊन अंगावर घेत पडतात आणि गार हवा असेल तर निवाऱ्याच्या जागी पडतात. फुरशी अनेक प्रकारची भक्ष्ये खातात. त्यात उंदीर, सरडे, छोटे पक्षी-आणि तुमचा विश्वास बसणार नाही - विंचू यांचा समावेश असतो. त्यांना पिल्ले होतात; जन्माच्या वेळी पिल्लांची लांबी अवघी ८ सें.मी. असते. साधारणपणे एका वेळी ४ ते ८ पिल्ले होतात.





फुरसे

भारतात राहाणाऱ्या आपणाला बडे चार या घातक सापांविषयी माहिती असणे फार महत्त्वाचे आहे. हे साप इतर सापांप्रमाणेच दिसत असल्यामुळे चूक होणे फार सहज आहे. प्रथम दर्शनी नाग हा धामणीसारखा दिसतो. पण धामणीचे डोके जास्त टोकदार व डोळे गोलाकार असते हा फरक लक्षात ठेवा. मणियारचा त्याच्याहून छोट्या व निरुपद्रवी कवड्या सापाशी नेहमी घोटाळा केला जातो. तसेच घोणशीचा अजगराशी आणि फुरशाचा त्याच्याहून अधिक लांब व अधिक बारक्या अशा मांजरसापाशी घोटाळा केला जातो.

तुम्हाला एकदा बड्या चारांच्या सवयी आणि ते कुठे राहातात याची माहिती झाली की तुम्ही त्यांच्या मार्गात येणार नाही. काटेरी झुडपांमधून चालताना, वर एखाद्या झाडाकडे पाहात चालू नका, तर तुमचा पाय एखाद्या सापावर पडून तो तुम्हाला चावणार नाही याची खात्री करण्यासाठी नजर वारंवार खाली वाटेवर लावून चाला.

नित्य आढळणारा मणियार



## इतर विषारी साप

बडे चार हे ज्यांच्यावर आपण कडक नजर ठेवली पाहिजे असे भारताचे **सामान्य** धोका-दायक साप आहेत. पण दुसरेही काही आहेत आणि ते तुम्हाला कधी भेटतीलही. तथापि तुम्ही त्यांना पाहाण्यासाठी खास निघालात तर ते तुम्हाला दिसले तर दिसतील, एरवी शक्यता अगदीच कमी. सर्प-संग्राहक हरानाग हे साप गोळा करण्यासाठी खास जंगलात जातात अथवा समुद्रसर्प पैदाशीच्या हंगामात अंडी घालतात ते पाहाण्यासाठी छोट्या बेटांवर जातात, तेव्हा त्यांना या सापांचा सुगावा लागतो. बड्या चारांखेरीज भारतात विषारी रूपांचे चार महत्त्वाचे गट आहेत.

### समुद्रसर्प

आम्ही मद्रासला समुद्रकिनाऱ्याच्या अगदी जवळ राहातो. आमच्या घराच्या फाटकाबाहेर कोळी जाळी टाकत असल्याचे आम्ही नेहमी लक्ष देऊन पाहातो. जाळ्यात पकडलेले मासे ते जाळीदार विणलेल्या झोळीत ओततात तेव्हा कधी कधी त्यात फटकारे हाणणारा समुद्रसर्प असतो. कोळी त्याला त्याच्या मधल्या अंगाशी उचलतो आणि परत समुद्रात फेकून देतो, हे आम्ही कितीदा तरी बघितले आहे. हे कोळी या सापाला किती बेपर्वाईने हाताळतात! त्याच्या विषावर भारतात प्रतिबंधक लस तयार होत नाही हे अशा प्रसंगी अधिकच जाणवते. पण खरी गोष्ट अशी आहे की समुद्रसर्प सर्वसाधारणपणे चावत नाही नि त्यांच्यापासून पोहणारे लोक व कोळ्यांना काही धोका नसतो. आम्ही एकदा पॅसिफिक महासागरात पोहोत असताना एका समुद्र सर्पाला खेटलो, पण आम्हाला पाहाताच त्याने मागे सूर मारला आणि प्रवाळ खडकाच्या एका फटीत नाहीसा झाला.

भारताच्या किनारपट्टीलगतच्या पाण्यात राहाणाऱ्या व पोसणाऱ्या समुद्रसर्पांच्या २० जाती आहेत. गळासारखे नाक व अंगावर पट्टे असलेला समुद्रसर्प हा सर्वांत सामान्य समुद्रसर्प होय. सर्व समुद्रसर्पांच्या शेपट्या सपाट व वल्ह्यांसारख्या असतात. अशा शेपट्यांनी पाणी तोडून पुढे जाण्यास मदत होते. समुद्रसर्प मासे खातात आणि त्यांचे विष इतके ज्वलज्जहाल असते ते कदाचित याचसाठी. आपले गुळगुळीत, बिलबिलित भक्ष्य निसटून जाण्याच्या आधी ते पंगू झाले पाहिजे, अशी ही योजना असावी.

समुद्रसर्प समुद्रात राहात असल्याने आपल्याला त्यांच्याविषयी फारच थोडी माहिती




समुद्रसर्प - त्याची सपाट व वल्ह्यासारखी शेपूट पहा.

आहे. बहुतेक जाती पिल्लांना जन्म देतात. एक जात मात्र पाणी व जमीन या दोन्ही ठिकाणी वावरणारी आहे. या जातीच्या माद्या अंदमानमधील खडकांची बेटे व खाणी अशा ठिकाणी अंडी घालण्यासाठी किनाऱ्यावर येतात. न्यू ग्वायनाच्या किनाऱ्यासमोर असलेल्या 'लायन आयलंड' या बेटावर एक दिवशी दुपारी झांडांवरुन पडलेल्या पानांखालच्या गारव्यात विश्रांती घेत असलेले अनेक समुद्र सर्प आम्ही बघितले. एकत्र बांधलेल्या शेवयांच्या जुडग्यासारखे ते पडतात. आमच्यापैकी एकाने चुकून त्यांच्यावर पाय दिला तरी त्यांनी त्याला चावण्याची तसदी घेतली नाही.

समुद्रसर्प श्वास रोखून पाण्याखाली पाच तास राहातात. पाण्यात सुमारे १०० मीटर खोल ते बुडी मारु शकतात. समुद्रकासव व खाऱ्या पाण्यातील मगरी यांसारख्या सागरी सरपटी प्राण्यांप्रमाणे समुद्रसर्पांनाही शरीरातून जादा क्षार बाहेर टाकण्याच्या ग्रंथी असतात.

## हरानाग

या सापाच्या नाकपुड्या व डोळे यांच्यामध्ये छोटीशी खळगी असते. ही खळगी 'उष्णता हेरक' असते; ती इतकी संवेदनाक्षम असते की एखादा उष्ण रक्ताचा प्राणी जवळ आल्याने तपमानात होणारा फरक ती टिपते. या सापाचे डोळे जरी तुम्ही बांधले तरी तो तशाच स्थितीत भक्ष्याच्या मागे लागून त्याला बरोबर पकडील. भारतात हे साप सामान्यतः चहा व कॉफीच्या मळ्यात आढळतात. कारण जेथे ही पिके घेतली जातात त्या प्रदेशातील जमिनीची उंची व हवामान त्यांना उत्तम मानवते. या सापाच्या १५ जाती असून ते चावल्याचे प्रकार बरेच घडतात. पण सापाचे विष तेवढे जहाल नसून त्याने मृत्यू क्वचितच येतो. मलबार आणि नाकाची गुंजडी असलेली, या दोन जाती हरानागाच्या अगदी सामान्य जाती होत.

हरानाग हे जंगलवासी साप असून त्यांच्य जगण्यात एक प्रकारची गुप्तता असते. बेडूक, सरडे आणि छोटी पाखरे हे त्यांचे खाद्य. हरानागांचे बच्चे बेडूक व सरड्यांना आकृष्ट करण्यासाठी एक "युक्ती" योजतात : ते भक्ष्याला मोहात पाडण्यासाठी आपली रंगतदार शेपटी उंच करतात आणि हा काय प्रकार आहे हे पाहाण्यासाठी ते भक्ष्य जवळ आले की त्याला पकडतात. काही हरानाग झाडांत तर काही नदीनाल्यांच्या ओल्यागार तीरावरील जमीन व झुडपांवर राहातात.



मलबार हरानाग

## राजनाग

राजनाग (याला 'राजसर्प' असेही म्हणतात) हा जगातला सर्वात मोठा विषारी साप असून त्याच्या जीवनकथेसारखी मनोरंजक जीवनकथा इतर दुसऱ्या कोणत्याही सापाची नाही. राजनाग हा असा एकच साप की जो घरटे बांधतो. तसेच नरमादीची आयुष्यभरची जोडी या सापांमध्येच आढळते. रॉमने दक्षिण भारतातील जंगलात अनेक राजनाग पकडले, आणि अंदमान बेटातील अती दमट, घनदाट जंगलात माद्या त्यांच्या घरट्यांवर बसलेल्या पाहिल्या. राजनाग माणसांवर हल्ले करतात अशा ज्या कथा सांगितल्या जातात त्यांत काही तथ्य नसल्याचे त्याला आढळून आले. राजनाग हे अतिशय बुद्धिवान पण सौम्य असे साप असून संधी मिळाली तर माणसांच्या मार्गातून ते पटकन दूर होतात.

भारतात राजनाग जास्ती करून पश्चिम घाटातील डोंगर, ईशान्य भागातील जंगले आणि हिमालयाच्या पायथ्यापासच्या टेकड्या या ठिकाणी वस्ती करतात. ही ठिकाणे जंगलांनी व्याप्त व थंड आहेत. गंमत अशी की ते अंदमानची अती दमट व घनदाट जंगले व ईशान्य समुद्रकिनारा येथेही आढळतात. चहा व कॉफीच्या मळ्यात हे साप निघाल्याच्या बातम्या

सतत येतात आणि मग ते मारले जातात. खरे तर हे मळे या प्राण्यांचे बरेच मोठे नैसर्गिक वसतीस्थान बळकावून बसले आहेत.

घरटे बांधण्यासाठी मादी झाडांची पाने खरवडून काढून त्याचा ढीग रचते आणि त्यात २० ते ३० अंडी घालते. अंडी ६० दिवसांनी उबतात. तोपर्यंत मादी घरट्यावर अथवा त्याच्याजवळ राहाते. अंदमानमधील एक घरटे ३० सें.मी. उंच होते. अंड्यातून बाहेर आलेल्या बच्च्यांच्या अंगावर तेजस्वी रंगतदार पट्टे असतात; ते बाहेर आल्यावर लागलेच इतस्ततः विखुरतात. राजनाग हे स्वजातभक्षक आहेत, ते इतर साप खातात. बच्चे मुख्यतः गवत्यासारख्या छोट्या सापांवर, तर प्रौढ धामणींवर पोसतात.

राजनाग हे घनदाट जंगलात राहात असल्याने माणसांशी त्यांचा फार क्वचितच मुकाबला होतो, आणि ते चावल्याने माणसे दगावल्याची अलिकडे नोंद नाही. राजनागाने दंश करूनही बिल हास्ट वाचला, अशी उदाहरणे फारच थोडी.

प्रवाळ साप



## राट

राट हे विषारी साप सतेज रंगाचे व अंगाने बारीक असतात. भारतात त्यांच्या पाच जाती आहेत. सर्वात मोठा, पट्टेवाला राट एक मीटर लांबीपर्यंत वाढतो आणि तो घातक ठरू शकतो. तथापि भारतात हे साप चावल्याने माणसे दगावल्याची नोंद नाही. अमेरिकेत लहान मुले तेजस्वी रंगाच्या राटना चुकून 'स्कार्लेट किंग' (हा तिकडील एक साप) आणि इतर बिनविषारी साप समजून मजेने उचलतात. पण सुदैवाने राट मुलांना चावल्याची उदाहरणे अगदी कमी आहेत.

या सापांची माळरानांपासून ते उत्तुंग हिमालयांपर्यंत अनेक वसतीस्थाने आहेत. त्यांचे उद्योग रात्री चालतात आणि दिवसा ते पाने, पानांचा हिरवा लगदा (ह्युमस) अगर लाकडाचे ओंडके यांच्याखाली आराम घेत पडतात. ते अंडी घालतात. इतर अनेक छोट्या सापांप्रमाणे राटचेही शत्रूपासून आपला बचाव करण्याचे मार्ग चलाखीचे असतात. उदाहरणार्थ, शत्रूचे लक्ष आपल्या डोक्यापासून उडवण्यासाठी ते आपल्या रंगतदार शेपट्या हवेत फडकवतील.

## सर्पदंश

पूर्वीच्या काळी भारतात जेव्हा विषप्रतिबंधक लस तयार होत नव्हती तेव्हा सापांविषयी भीती वाटणे स्वाभाविक होते. सापाच्या विषावर कोणताही इलाज नव्हता आणि एखाद्या विषारी सापाचा दाताचा व्रणसुध्दा मृत्यूस कारण होत असे. तथापि विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकाच्या सुरुवातीला मुंबईच्या हापकिन इन्स्टिट्यूटने विषप्रतिबंधक लस तयार केली. ही एक आश्चर्यजनक औषधी असून तिने दरसाल हजारो लोकांचे प्राण वाचतात. सापाच्या विषाचे छोटे छोटे डोस घोड्याला टोचून ही लस तयार करण्यात येते. अंगात अशा प्रकारे विष भिनून राहिल्याने घोडे त्याच्या परिणामांपासून मुक्त होतात. त्याचे रक्त नंतर प्राण वाचवणारी ही लस तयार करण्यासाठी उपयोगात आणण्यात येते. ही लस आपले कार्य अतिशय वेगाने करते. हा तिचा उल्लेखनीय विशेष होय. एका माणसाला साप चावला तेव्हा त्याचे शरीर जवळ जवळ निर्जीव झाल्याचे आम्ही पाहिले. नटेसन असे या माणसाचे नाव. विषप्रतिबंधक लस टोचल्यावर नटेसन अर्ध्या तासाच्या आत उठून बसला आणि त्याने चहा घेतला.

सापाचे विष ही प्रत्यक्षात एक प्रकारची उच्च प्रक्रिया केलेली लाळ असून साप भक्ष्य मारणे व ते पचवणे या दोन्ही कामासाठी तिचा उपयोग करतो. विष हे काही माणसाच्या विरोधात निर्माण झालेले नाही. आपणा माणसांचा अवतार होण्याच्या फार पूर्वीपासून साप पृथ्वीवर नांदत आहेत.

सापाच्या विषाचे दोन प्रकार आहेत एक, मज्जातंतूवर अनिष्ट परिणाम करते, (नाग व मणियार यांचे विष) तर दुसरे रक्तावर. (घोणशीच्या वर्गातील साप.) चारी बड्यांच्या दंशावर परिणामकारक ठरेल अशी एक विषप्रतिबंधक लस बनवण्यात आली असून ती उपलब्ध आहे.

कुणाला विषारी साप चावला तर दोन गोष्टी लक्षात ठेवा : एक, त्या माणसास इस्पितळात नेऊन विषप्रतिबंधक लस टोचून घ्या; दोन, म्हातारीची जडीबुट्टी, मांत्रिकांचे मंत्रतंत्र आणि गवतपाल्याची औषधे यांवर बहुमोल वेळ दवडू नका.

साप चावला असता मांत्रिकाकडे जाऊ नका.



तुम्हाला साप चावला तर मन शांत ठेवण्याचा प्रयत्न करा. माणूस जेव्हा भेदरतो किंवा प्रक्षुब्ध होतो तेव्हा त्याचे रक्ताभिसरण अधिक जलद होते. त्याने विषही रक्तात फार लवकर भिनते. नंतर सापाने शरीरावर जेथे दंश केला असेल त्याच्या वरच्या भागावर कापडाची पट्टी अगर चिंधी बांधा. साप पायाला चावला असेल तर कापडाची पट्टी मांडीला बांधा. पट्टी फार घट्ट आवळून बांधू नका. बांधलेल्या पट्टीतून तुमचे बोट जाईल अशा बेताने ती बांधा.

पण विषारी सापांनी केलेल्या सर्वच दंशांनी मृत्यू ओढवतो असे नाही. फार थोडे सर्पदंश प्राणघातक ठरतात. जसा प्रत्येक डासाचा चावा मलेरियास कारणीभूत होत नाही, तसे प्रत्येक सर्पदंशाने शरीरात विष भिवत नाही. आमच्या माहितीतील बहुतेक सापधऱ्या माणसांना साप चावले ते 'सुके दंश' होते, म्हणजे त्यांच्या शरीरांत विष टोचले गेले नाही. डंख अतिशय जोरदार असूनही काही विषांचा ताबडतोब परिणाम होत नाही, ( मणियारसारख्या सापांच्या विषाचा) म्हणून सर्पदंश झाल्यावर इस्पितळात जाणे शहाणपणाचे होय.

सापधऱ्यांना साप चावले ते बहुतेक "सुके दंश" होते



# निरूपद्रवी साप



कासेपाठ झाडसाप

## झाडसाप

झाडसाप अंगाने बारीक व लांब असतात आणि त्यांच्या हालचालीत झपाटा असतो. त्यांची दृष्टी चांगली असते; यायोगे त्यांना झाड-बेडूक, सरडे आणि झाडे व झुडपांच्या शेंड्यांवर बसलेले पक्षी पकडण्यास मदत होते. भक्ष्य एकदा नजरेने टिपले की हे साप त्याच्यामागे धावून त्याला झटक्यात पकडतात. झाडसापांना उघड्यावर व दिवसा दबा धरून भक्ष्य पकडावे लागत असल्याने, त्यांची सारी भिस्त दृष्टी व वेग यांवर असते.

भारतात झाडसापांचे तीन मुख्य गट आहेत. एक, काशाच्या रंगाची पाठ असलेले साप – यांना आपण कासेपाठ म्हणू; दोन, वेल साप; आणि तीन, मांजर साप. हे साप बागांमध्ये नेहमी दिसतात. तसेच ताडाच्या झावळ्यांनी बनवलेल्या छपरांमध्येही ते अनेकदा दिसतात. निवारा व सावलीसाठी ते या छपरांमध्ये बसतात. बागेचे माळी फुलझाडांच्या वाफ्यांमधून चक्कर मारतो किंवा एखाद्या कुंडीतील रोपट्याची निगराणी करतो तेव्हा पुष्कळ वेळा त्याची कासेपाठाची गाठ पडते. कासेपाठाचा रंग सुंदर गडद तपकिरी असून त्यावर फिकट काशाच्या रंगाचा पट्टा असतो. याचा एकूण परिणाम चॉकोलेटसारखा होतो.

कासेपाठाचे भक्ष्य तुरुतुरु धावणारे चकचकित रंगाचे सरडे हे होत. एकदा आम्ही आमच्या खिडकीमधून एका कासेपाठाने अशाच एका सरड्यास पकडल्याचे पाहिले. सरड्याने चटकन आपली शेपटी तोडून टाकली. हे करताना तुम्ही सरड्याला पाहिले आहे का? कासेपाठ शेपटी गिळण्यासाठी थोडा वेळ थांबला. नंतर त्याने रेती उकरून सरड्याला पकडले आणि खाल्ले.

कासेपाठ हे काटक व कसरतपटू साप आहेत. पलायन करताना किंवा भक्ष्याचा पाठलाग करतात तेव्हा ते एका फांदीवरुन दुसऱ्या फांदीवर अशा लीलया उड्या मारतांना दिसतात. मादी सुमारे ६ अंडी एखाद्या बिळात किंवा फटीत घालते. अंडे आकाराने छोटे पण लांबट असते भारतात जून महिन्याच्या सुरुवातीला अंडी उबून पिल्ले बाहेर येतात. या वेळी पडणाऱ्या पहिल्या पावसाबरोबर बेडूक व अशाच इतर प्राण्यांचा प्रादुर्भाव होतो. कासेपाठ सापांच्या पिल्लांना त्यांचे अन्न असे विनासायास मिळते.

वेल साप हा झाडसापांचा दुसरा गट. लांबट, टोकदार डोके आणि धोकेबाज डोळे असे हे साप म्हणजे सर्प जगातील विदूषकच होत. घाबरला की या सापाचा श्वासोच्छ्वास जोरात चालतो आणि तो शरीरात हवा भरुन घेतो. याने त्याच्या खवल्यांमधील काळ्या व पांढऱ्या रंगाची चौकड्यांची चित्राकृती दिसते. ही चौकड्यांची चित्राकृती आणि पांढरे व गुलाबी तोंड याने हा साप देखणा दिसतो. वेल साप सुमारे ८ पिल्लांना जन्म देतात. पिल्ले ही आई बापांची प्रतिकृती असतात; नाके मात्र नकटी. वेल सापांच्या डोंगरभागात राहाणाऱ्या अनेक जाती आहेत. या जातींचा रंग तपकिरी अथवा नारिंगी असतो व डोके तेवढेसे टोकदार नसते.

मांजर सापांना हे नाव पडले याचे कारण त्यांचे मोठे डोळे आणि निशाचरी सवयी. हे साप अंगाने अतिशय बारीक व लांबट असतात. ते आपल्या पिसासारख्या जिभेचा अन्नाचा वास

वेल सापाचे पानाच्या आकाराचे डोके



घेण्यासाठी उपयोग करतात. यांत पाली, सरडे, छोटे उंदीर व छोटी पाखरे यांचा समावेश होतो. मांजर साप ६ ते ८ अंडी घालतात. त्यांचे विषाचे दात लांबट असून विशेष हे की ते तोंडात मागच्या बाजूस बसवलेले असतात. फॉस्टनचा मांजर साप २ मीटर लांबीपर्यंत वाढतो आणि तो चावल्यास खूप वेदना होतात. मांजर सापाच्या ज्या ११ जाती आहेत त्या बहुतेक डोंगरी आहेत. सामान्य मांजर साप मैदानी प्रदेशातही आढळतो.

या मांजर सापांचा पुष्कळ वेळा फुरशाशी घोटाळा केला जातो. मांजर साप फार बारीक असतो आणि पुष्कळ वेळा तो ताडाच्या झावळ्यांच्या छपरांमध्ये आढळतो. झाडसापांमध्ये सर्वात दिव्य साप जर कोणता म्हणाल तर तो 'उडता' साप! जंगलातील उंच झाडावरुन ३० मीटर खाली जमिनीवर हा साप तरंगत येतो यावर विश्वास बसणे कठीण आहे. पण ते खरे आहे. आपले शरीर सपाट करून तो "उडतो"; म्हणजे कागदी बाणासारखा हवेतून झेपावत येतो. आम्ही

मांजर साप





पाणसापाचा दंश कधीकधी वेदनादायक असतो पण त्याने इजा होत नाही.

हे साप बंदिस्तीत ठेवले असून त्यांना पाली, उंदीर व बेडूक खायला देतो. त्यांची रंगसंगती खरोखर नजर खिळवून ठेवील अशी असते. काळ्या रंगावर पिवळ्या व पांढऱ्या रंगाच्या रेषा आणि लाल रंगाचे शिपके. उडते साप अंडी घालतात - एका वेळी बहुधा ८ ते १०.

## पाणसाप

नावात सूचित केल्याप्रमाणे पाणसाप त्यांचा बहुतेक वेळ पाण्यात घालवतात.बेडूक व मासे हे त्यांचे खाद्य. भारताच्या नद्यांतील एकही साप विषारी नाही. पण तुम्ही एखाद्याला उचललात तर त्याच्या धारदार दातांवर लक्ष ठेवा. मचूळ पाण्यातील सापांना सौम्यसे विष असते. त्यांचे भक्ष्य पकडण्यास याने मदत होते. पण हे विष माणसाला इजा करणारे नाही.

पाणसाप हे सरासरी आकाराचे असतात - फार बारीक नाहीत आणि फार जाड नाहीत. जमिनीवरील त्यांच्या हालचालीत झाडसापांचे चापल्य व गती नसते. इकडेतिकडे जाण्यास ते त्यांना पाहिजे तेवढा वेळ घेतात. तथापि एकदा

पाण्यात गेले की ते ताकदवान होतात आणि भराभर पोहतात.

भारतात पाणसापांच्या ज्या २० जाती आहेत त्यांतील बहुतेकांचे वैशिष्ट्य हे की त्यांच्या अंगावरच्या प्रत्येक खवल्यामध्ये एक छोटीशी घडी असते. नद्यांमधील सर्वात सामान्य साप म्हणजे पाणदिवड आणि नानेटी. हे दोन्ही साप देशाच्या बहुतेक भागांत आढळतात. पण प्रामुख्याने ते मैदाने व खुज्या टेकड्यांच्या प्रदेशांचे रहिवासी आहेत. पाणदिवडच्या रंगात काळ्यापासून ते पिवळ्यापर्यंत विविधता असते व त्यावर पांढऱ्या काळ्या रंगाच्या चौकटींची चित्राकृती असते. घाबरले असता डोके सपाट करुन नागाप्रमाणे अंग ताठ करुन उभे होताना या सापांना आम्ही पाहिले आहे. ताजा पकडलेला दिवड कडकडून चावणारा असतो. मादी सुमारे २० ते ४० अंडी एखाद्या बिळात किंवा बोगद्यात घालते आणि ती उबेपर्यंत त्यांजवळ राहाते.

नानेटीचे डोके दिवडपेक्षा बारीक असते आणि त्याचे अंग गडद हिरवे असते. हा थंड डोक्याचा साप असून तो कधीच चावत नाही. (तुम्ही बेडूक अथवा बेडकाचा बच्चा नसाल तर) या सापासंबंधी आम्ही एक मजेशीर गोष्ट पाहिली : तो डासांच्या अळ्या खातो. साप आपल्याला विनामूल्य देत असलेली आणखी ही एक सेवा.

कुत्र्याच्या तोंडासारखे तोंड असलेला 'पाणसर्प' हा आणखी एक पाणसाप. खाड्या, मिठागरे, समुद्रानजिकची मचूळ पाण्याची तळी व नद्या यांचा हा सामान्य रहिवासी आहे. त्याचा रंग राखी असून पाठीवर काळ्या रंगाच्या रेषा असतात. त्याच्या प्रत्येक डोळ्याच्या मागे फरकाटे ओढल्यासारखे दोन पट्टे असतात. हा एक ओबडधोबड, मंदबुध्दीचा साप आहे. विषाचे दात तोंडाच्या मागच्या भागात असलेल्या दलदलवासी सापाच्या ज्या सहा जाती आहेत त्यातील भारतातली ही जात.

आमच्या घराजवळ 'श्वानमुखी'ची अशीच एक वस्ती आहे. या ठिकाणी कधी कधी रात्री आम्ही मासे पकडण्यासाठी जातो. प्रकाशाच्या झोतात येथला चिखल वळवळत्या राखी शरीरांनी जिवंत झाल्यासारखा वाटतो. 'श्वान मुखी' काटेरी माशांना पकडून खाताना आम्ही पाहिले आहे. फिकट चंद्रप्रकाशात हे साप चौफेर

पाणदिवड सापाची मादी व तिची अंडी



नानेटी





"श्वानमुखी" पाण साप

असे 'प्रादेशिक' नृत्य करतानाही आम्ही पाहिले आहे. जमिनीवर हे साप सरळ पुढे असे न जाता कुशीने बाजूबाजूला सरकत जातात. झपाट्याने हालचाल करायची असेल तर ते बाजूला एक प्रकारे उड्या मारीत जातात. खाऱ्या व मचूळ पाण्यातील सर्व साप एका वेळी १० ते ३० पिल्लांना जन्म देतात.

पासाळ्यात तुमचे मित्र जेव्हा तुम्हाला सांगतात की त्यांनी कुठे तरी खूप मोठ्या संख्येने साप रस्ता ओलांडून जाताना पाहिले तेव्हा ते हमखास पाणसापच असतात. आम्हाला कुणी तरी त्यांच्या घरी निघालेला साप पकडायला बोलवायला येते तेव्हा तो बहुधा पाणसापच असतो. तसेच जेव्हा कुणी एखादा विषारी साप मारल्याची फुशारकी मारतो तेव्हा बहुतेक वेळा तो असतो निरूपद्रवी पाणसाप.

नाग व धामणी सापडणे मुश्किल झाले तेव्हा कातड्याच्या व्यापारासाठी पाणसाप लाखांच्या संख्येने मारले गेले.



## पोखरणारे साप

पोखरणारे साप जमिनीच्या खाली राहातात. अर्थात सूर्याची उष्णता टाळण्यासाठी व हल्लेखोरांपासून लपण्यासाठी. इतर काही सापही जमिनीच्या खाली जातात. पण पोखरणारे साप हे असे एकच की जे आपला मार्ग स्वतः उकरतात. इतर साप हे उंदीर, खेकडे व वाळवींनी केलेल्या भुयारांवर अवलंबून असतात. पोखरणाऱ्या सापाची टाळू पहारीच्या टोकाइतकी जोरदार असते. कणखर, खुटखुटित शरीर आणि मानेचे बळकट स्नायू यामुळे या सापाला मऊसूद माती उकरुन अगदी सहज वाट तयार करता येते. या सापाच्या डोंगरी जातींना थंडावा इतका आवश्यक असतो की माणसाने असा एखादा साप हातात घेतला तर तो ताबडतोब मरतो (माणसाचे सरासरी तपमान ३७° सें. असते.)

भारतात पोखरणाऱ्या सापांच्या तीन जाती आहेत : एक, गांडूळ साप (याचा गांडूळाशी नेहमीच घोटाळा केला जातो.) दोन, 'शिल्ड टेल' आणि तीन, डुरक्या घोणस.

## गांडूळ साप

गांडूळ सापांच्या १४ जाती आहेत. चिमुकले डोळे आणि चकचकित खवले पाहिले नाहीत तर या सापांना गांडुळे समजण्याची चूक होणे अगदी साहाजिक आहे. सामान्यांतला सामान्य गांडूळ साप रंगाने लालसर तपकिरी असतो आणि देशाच्या सर्व भागांत तो आढळतो. गांडूळ सापांमध्ये नर नाही फक्त माद्याच आहेत हा शोध शास्त्रज्ञांना लागला तेव्हा ते विस्मयचकित झाले. मादी नराच्या मदतीखेरीज आपली आपण ५ ते १० अंडी फळवू शकते.

गांडूळ साप ओलसर, पाणथळ जमिनीत अथवा पानांच्या खाली आढळतात अथवा पानांच्या खाली आढळतात. जमिनीच्या जीवजीवाणू व अळ्यांवर ते पोसतात. हे साप हातात धरले तर सर्व पोखरणाऱ्या सापांप्रमाणे ते आपल्या बचावासाठी हाताला शेपटीने टोचे मारतात. याने लोकांचा असा समज झाला की हे साप शेपटीने दंश करतात – अर्थात हे कोणताही साप करू शकत नाही.

## शिल्डटेल

दक्षिण भारतात आढळणारा एक साप. डोंगरभागात सापांचा शोध घेत असता आमची या छोट्या, भरदार अंगाच्या सापाची गाठ पडली. त्याचे खवले मऊ व तकतकित असतात. गंमत



गांडूळ साप

अशी की शील्डटेलचे पोट अतिशय रंगतदार असते, तर पाठीचा रंग कळाहीन असतो. या विचित्र रंगसंगतीमुळे या सापांना हल्लेखोर शत्रूंपासून आपले प्राण वाचवण्यास मोठींच मदत होते. पाठीचा कळाहीन रंग सर्पभक्षकांना फसवा ठरतो, तर पोटाचा तजेलदार रंग बेरुचकर असला पाहिजे असा त्यांचा चुकीचा समज होतो. शिल्डटेलच्या अंगाला लकलकणारी चमक असते, त्यामुळे त्याच्या अंगाला माती व चिखल चिकटत नाही. दक्षिण व मध्य भारताच्या टेकड्यांच्या प्रदेशांत या लोभसवाण्या सापाच्या सुमारे ४० जाती आहेत. ते एका वेळी सामान्यतः ३ ते ५ पिल्लांना जन्म देतात आणि गांडुळे व त्यासारख्या जीवजिवाणूंवर गुजराण करतात.

टेकड्यांच्या प्रत्येक रांगेत या सापांची निदान एक तरी अगदी भिन्न अशी जात आहे. ही जात आपल्या भाईबंदांपासून पूर्णतया अलगपणे उत्क्रांत झालेली अशी आहे. तेव्हा प्राण्यांच्या उत्क्रांतीचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रज्ञांना हा फार आस्थेचा विषय होतो. प्रत्येक गट आपल्या विशिष्ट पर्यावरणात तगून राहाण्यासाठी आपले खास असे गुणधर्म विकसित करतो. ज्याप्रमाणे आफ्रिकेतील जिराफांनी जो झाडपाला इतर प्राणी खाऊ शकत नाहीत तो खाण्यासाठी उंच माना विकसित केल्या त्याप्रमाणे शिल्डटेल सापांनी आपले पोषण व शत्रूपासून संरक्षण करण्यासाठी स्वतःची खास अशी वैशिष्ट्ये उत्क्रांत केली.

शिल्डटेल हे जंगलवासी साप आहेत. सालोसाल आपल्याकडे जंगलातील हजारो एकर क्षेत्रातील झाडे तोडली गेल्यामुळे हे साप आता दुर्मिळ झाले आहेत. जेव्हा जंगलातील झाडे तोडली जातात तेव्हा खालची माती व हवा ताबडतोब गरम होते आणि जंगलच्या गारव्यातच जे फक्त राहू शकतात असे छोटे प्राणी व वनस्पती मरते.

## डुरक्या घोणस

डुरक्या घोणस (सँड बोआ) हा आपल्याकडील साप दक्षिण अमेरिकेतील

"शिल्डटेल" साप



सुप्रसिध्द बोआ कॉंस्ट्रिक्टरच्या नात्यातला साप आहे. तसेच त्याचे अजगराशीही जवळचे नाते आहे. हे बिनविषारी साप बळकट स्नायूंच्या आपल्या विळख्यात भक्ष्याला पिळवटून काढून ठार मारतात. भारतात'डुरक्या घोणस सापाच्या दोन जाती आहेत. दोन्ही हाडापेराने मजबूत, घट्ट असून विशेषतः जमिनीखालील हालचालींना योग्य अशी त्यांची अंगकाठी असते. सामान्य डुरक्या घोणस फार लवकर चिडतो आणि चिडला की लगेच डंख मारतो. या उलट लाल डुरक्या घोणस हा अतिशय धीराचा असून तो कधीच चावत नाही, यामुळे मुलांना सापांची ओळख करून देण्यास लाल डुरक्या हा अगदी आदर्श साप म्हणता येईल. हे साप मुख्यतः उंदीर खातात त्यामुळे शेतकऱ्यांचे ते आणखी एक मित्र होत. एखादा अजगर रानडुकराला ज्या कौशल्याने व आत्मविश्वासाने पकडील त्याच कौशल्याने व आत्मविश्वासाने नुकताच जन्मास आलेला डुरक्या एका बारक्या उंदराला पकडताना आम्ही पाहिले आहे. डुरक्या घोणस पिल्लांना जन्म देतात. एका वेळी बहुधा ६ ते ८. नव्याने जन्मलेली पिले बारके उंदीर, छोटी पाखरे, सरडे व किडे खातात. काही दिवसांपूर्वी आमचा मुलगा पक्ष्यांचा किचकिचाट ऐकून धावत बाहेर आला. पाहातो तो काय, एका डुरक्या घोणस सापाने आपल्या विळख्यात एका सातभाईपक्षास घट्ट आवळले आहे. हा पक्षी आपल्याजवळ कधी येतो याची वाट पाहात तो दबा धरून बसला होता हे तर उघडच होते.

## भूमिवासी साप

भारताच्या मैदानी प्रदेशात अनेक प्रकारचे मोठे साप आढळतात. धामण हा त्यांपैकी एक; तसाच सुप्रसिध्द अजगर हाही. 'ट्रिंकेट' व 'रॉयल' ( इंग्रजी नावे ) सापांसारखे इतरही काही सामान्य साप आहेत. पण आपल्याला ते सहसा दिसत नाहीत. यांखेरीज आणखीही कित्येक भूमिवासी छोटे साप असून ते देशाच्या निरनिराळ्या भागात विखुरलेले आढळतात. यांत कुक्री, गारगर आणि धावरा यांचा समावेश होतो.

### धामण

धामण हे साप आकाराने मोठे असून त्यांच्या हालचालीत वेग असतो. ते अडीच मीटर







धावट ('रेसर')

गारगर



लांबीपर्यंत वाढतात. त्यांचा आकार आणि रंग नागासारखा असतो. धामणी जेथे उंदरांचा वापर जास्त तेथे आढळतात. याच कारणासाठी भाताच्या शेतांत धामणी बहुधा आढळणारच. डोंगरावरची जंगले साफ करून डोंगर उतरणीवर शेती होऊ लागली तशा धामणी "वर वर" स्थलांतर करत आहेत. पालनी डोंगरात २००० मीटर उंचीवर आम्ही नुकतीच एक धामण पाहिली. पूर्वी धामणी १००० मीटर उंचीवर क्वचितच दिसत असत.

धामणींचे पोटभरण्याचे उद्योग दिवसा चालतात. शेताच्या नजीक व झुडपांमध्ये धामणी उंदीर, बेडूक व पक्षी यांची शिकार करतात. मोठ्या धामणीचा दंश वेदनाकारक असतो. धामणी आपला बचाव चपळाईने करतात. प्रथमच पकडले असेल तेव्हा धामण राजनागाप्रमाणे गळ्यातून गुरगुरल्याचा आवाज काढते ते आम्ही ऐकले आहे. अंगभर काळ्याभोर रंगापासून ते पिवळसर व तपकिरी रंगापर्यंत धामणींच्या रंगात विविधता आढळून

धामण



येते. मादी ८ ते १६ अंडी घालते आणि बच्ची आपला आहार बेडकांपासून सुरु करतात. पैदाशीच्या हंगामात नर द्वंद्वयुद्धाचे नृत्य करतात. हे नृत्य म्हणजे खरे तर नर ज्या क्षेत्रात राहातो त्या क्षेत्राचे संरक्षण आणि इतर नरांना त्या क्षेत्रात येण्यास मज्जाव करण्यासाठी असते.

इतर अनेक साप अशा लढती करतात. तथापि या लढतीत कुणाही भिडूस शारीरिक इजा होत नाही. मात्र लढत नेहमी दोन नरांमध्ये असते. बऱ्याच लोकांची कल्पना आहे त्याप्रमाणे मादीशी याचा काही संबंध नसतो. धामण हा सर्व सापांपेक्षा अधिक नजरेस पडणारा सामान्य व मोठ्यात जमा होणारा साप असल्याने त्याच्याविषयी दंतकथा व गोष्टी पुष्कळ आहेत.

### अजगर

अजगर हे जगातले आकाराने सर्वात मोठे सामान्य साप होत. ते ८ ते १० मीटर लांबीपर्यंत वाढतात, आणि पूर्ण वाढ झालेल्या बिबळ्या वाघाला हेलपाटून अख्खाचा अख्खा गिळण्याइतकी प्रचंड ताकद त्याच्या स्नायूंमध्ये असते. भारतात अजगराच्या दोन जाती आहेत. एक, खडक अजगर; हा भारतात सर्वत्र आढळतो. माळराने व दाट जंगले या दोन्ही ठिकाणी तो राहातो. दुसरा, 'राजशाही' ('रिगल') अजगर - ईशान्य भारत आणि निकोबार बेटे येथे याची वस्ती असते. या दोघांपैकी तुम्हाला खडक अजगर दिसण्याची अधिक शक्यता आहे. परंतु कातड्याच्या उद्योगधंद्याने या अजगरांची बेसुमार लांडगेतोड केली.

खडक अजगर सहा मीटर लांबीपर्यंत वाढतात. अंगाने ते धष्टपुष्ट असतात. त्यांची त्वचा मऊ असते. त्यांच्या अंगावरची चित्राकृती बरीचशी डुरक्या घोणससारखी असते. अजगरांसंबंधी मौजेची गोष्ट ही की त्यांच्या पोटाला "खुंट" असतात. साप हे मगरीसारख्या पाय असलेल्या सरपटी प्राण्यांपासून उत्क्रांत झाले आहेत आणि अजगर व डुरक्या घोणस हे दोनच साप असे की ज्यांनी आपले पाय अद्याप पूर्णपणे विसर्जित केले नाहीत. पोटाला असलेले "खुंट" हे पायांचे अवशेष होत. थंड, दमट गुहा, झाडांचे बुडखे व ढोल्या ही अजगरांची वस्तीची ठिकाणे. ते रात्री छोटे सस्तन प्राणी व इतर भक्ष्याची शिकार करतात. अन्नाशिवाय ते अनेक दिवस राहू शकतात. पण पाणी मात्र त्यांना हवेच. प्राणीसंग्रहालयातला एक अजगर दोन वर्षे काही न खाता राहिला.

अजगराची मादी मार्च ते जून या काळात





अजगर मादी आपल्या अंड्याजवळ

उबलेली अ



१०० अंडी घालते आणि ती उबेपर्यंत त्यांच्या जवळ बसून राहाते. सर्पशास्त्रज्ञांना याचा प्रथम शोध लागला तेव्हा मुंगुसासारख्या हल्लेखोर भक्षकांपासून संरक्षण करण्याकरिता मादी अंड्यांजवळ राहाते असे त्यांना वाटले. अंड्यांना बुरशी लागू न देणे, मुंग्यांपासून त्यांचे रक्षण करणे आणि योग्य अशा आर्द्रतेत ती ठेवणे हीही अंड्यांजवळ राहाण्याची अजगर मादीची उद्दिष्टे असतात. पण सर्वात आश्चर्याची गोष्ट ही की अंडी ज्या तापमानात उबतात त्या तपमानाचे मादी नियंत्रण करू शकते. आपल्या स्नायूंना झटके देऊन ती आपल्या शरीराचे तपमान वाढवू शकते. झटके जेवढे जलद तेवढ्या प्रमाणात तिच्या शरीराची उब वाढते आणि अंड्यांना अधिक उब मिळते.

सापांसंबंधी यासारखे शोध करण्यात येत आहेत, कारण या चित्ताकर्षक प्राण्यासंबंधी शिकायचे अद्याप पुष्कळच बाकी आहे. सापांचा अभ्यास हा केवळ मनोरंजक विषय नाही तर नवे नवे शोध लावण्यास या क्षेत्रात भरपूर वाव आहे.





अजगराचे पिल्लू अंड्यातून बाहेर येत आहे.

## पाळीव प्राणी म्हणून साप

अनेक जातीचे साप बंदिस्तीमध्ये सहज माणसाळतात आणि चांगले पाळीव प्राणी होतात. अमेरिकेत खास बनावटीच्या काचघरात साप पाळण्याचा अनेक मुलांचा छंद असतो. भारतात ट्रिंकेट, डरक्या घोणस, नानेटी व पांडीवड या चार जातीचे साप चांगले माणसाळतात आणि त्यांना पोसणेही सोपे असते. ट्रिंकेट व डरक्या घोणस या सापांना उंदीर आणि नानेटी व पांडीवड यांना बेडूक व मासे यांवर पोसावे.

छोटा साप घरी पाळायचा तर मासे पाळण्याचे साधेसुधे काचघर पुरे आहे. त्याचे वरचे झाकण पक्के असले पाहिजे आणि त्यात हवा खेळती राहाण्याची व्यवस्था असली पाहिजे. काचघर स्वच्छ ठेवले, सापाला पिण्यास ताजे पाणी दिले आणि आठवड्यातून किमान एकदा खायला घातले की तो साप अंगाने चांगला भरेल आणि साप पाळण्याचा तुमचा हा छंद यशस्वी होईल. नव्याने पकडलेल्या सापाला हळुवारपणे व काळजीपूर्वक हाताळले पाहिजे, कारण घाबरला जाऊन आपला बचाव करण्याचा प्रयत्न तो नक्कीच करणार. असा साप नाजूकपणे व धीराने हाताळला तर त्याची भीती जाईल व तो बहुधा माणसाळेल. त्याने आपल्यापुढे शेपटी हलवावी व बोलावले की हजर व्हावे, अशी अपेक्षा धरू नका.

सापांना अगदी पाहिजे तशी परिस्थिती उपलब्ध करून देणे कठीण असल्याने बंदिस्तीमध्ये काही साप जमवून घेणार नाहीत, काही खाण्याचेच नाकारतील, तर कांही सतत निसटून जाण्याच्या प्रयत्नात राहातील. अशा सापांना पुन्हा रानात सोडून द्यावे.

साप चांगले पाळीव प्राणी होतात. →



Printers : Saraswati Art Printers Delhi - 6

